**महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजनेसाठी सन २०१८-१९ या आर्थिक वर्षातील २२१० जी २६२ या लेखाशिर्षाखालील निधी वितरीत करणेबाबत**

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः मफुयो-२०१८/प्र.क्र.१५६/आरोग्य-६

गो.ते. रुग्णालय आवार, १० मजला,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४०० ००१
दिनांक: १३ जुलै, २०१८

**वाचा :-**

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांकः अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.२ एप्रिल, २०१८
२) राज्य आरोग्य हमी सोसायटीचे क्र. राआहसो/डेक्स २/टे१/अनुदान/५३०४/४६८/२०१८, दिनांक १७ मे,२०१८

**प्रस्तावना :-**

महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजनेच्या अंमलबजावणीसाठी सन २०१८-१९ या वित्तीय वर्षासाठी २२१० जी २६२ (SCP) या लेखाशिर्षाखाली रु.२२०,००,००,०००/- (अक्षरी रुपये दोनशे वीस कोटी फक्त) इतका निधी उपलब्ध आहे. सदर योजनेच्या लाभार्थ्यांसाठी विमाहप्ता विमा कंपनीस अदा करणे, तसेच वेतन व प्रशासकीय खर्च यासाठी २२१० जी २६२ (SCP) या लेखाशिर्षाखाली निधी राज्य आरोग्य हमी सोसायटीस वितरित करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:-**

महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजनेची अंमलबजावणी राज्य आरोग्य हमी आरोग्य सोसायटीमार्फत होत असल्यामुळे योजनेंतर्गत पहिल्या व दुसऱ्या टप्प्यातील लाभार्थी कुटुंबाचा विमाहप्ता अदा करणे, तसेच योजनेवरील अन्य प्रशासकीय खर्च भागविणे, यासाठी सन २०१८-१९ या आर्थिक वर्षासाठी खाली दर्शविलेल्या लेखाशिर्षातर्गत अर्थसंकल्पीत केलेल्या तरतूदीतून रु. १३९,७०,००,०००/- (अक्षरी रुपये एकशे एकोणचाळीस कोटी सत्तर लक्ष रुपये फक्त) एवढा निधी राज्य आरोग्य हमी सोसायटीच्या खात्यावर तात्काळ वर्ग करण्यासाठी नियंत्रक अधिकाऱ्याकडे सुपुर्द करण्यात येत आहे. सदर रक्कमेचा धनादेश राज्य आरोग्य हमी सोसायटीच्या नावे काढण्यात यावा.

**मागणी क्र. आर-१**

२२१०- वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य
०१- नागरी आरोग्य सेवा- विषमचिकित्सा
७८९ - अनुसूचित जाती उप-योजना
(०१)-अनुसूचित जातीसाठी विशेष घटक योजना
(०१)(०१)-महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजना(अनुसूचित जाती उपयोजना)
(राज्य योजना)
२२१०जी २६२ (दत्तमत), ३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर)

२. सदर निधी सोसायटीकडे वर्ग करण्यास अनुदानाचे देयक अधिदान व लेखाअधिकारी, मुंबई यांच्याकडे सादर करण्यासाठी प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई हे आहरण व

संवितरण अधिकारी तसेच सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा, मुंबई हे नियंत्रक अधिकारी असतील.

३. सदर निधी फक्त अनुसुचित जाती तथा नवबौद्ध लाभार्थ्यांसाठी वापरण्यात यावा, याची दक्षता राज्य आरोग्य हमी सोसायटीने घ्यावी.

४. वित्त विभागाच्या दि.०२.०४.२०१८ च्या शासन परिपत्रकान्वये दिलेल्या सुचनांचे सर्व संबंधितानी काटेकोरपणे पालन करावे. तसेच प्रमाणित करण्यात येते की, सदर परिपत्रकासोबतच्या परिशिष्टातील नमुद अटींची पुर्तता झाली आहे.

५. सदर शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग यांच्या अनौ.संदर्भ क्र.१०७/१८/ अर्थसंकल्प (विघयो), दिनांक ०९.०७.२०१८ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरून व वित्त विभागाच्या क्र. अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक ०२.०४.२०१८ च्या परिपत्रकानुसार विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक 201807131426412917 असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Subhash Nivruti Gadge

Digitally signed by Subhash Nivruti Gadge
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Finance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b1f74930407346db2703eca69fb25a73a3ba8647d94e4c83579e877eeaa6372e, serialNumber=8aa1f531272224e355732cc20c64b2a014c4d982a276b8f3e7048995acbf1651, cn=Subhash Nivruti Gadge
Date: 2018.07.16 10:39:09 +05'30'

**(सु.नि. गाडगे)**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल, लेखा परीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता, मुंबई.
२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
३. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
४. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
५. मुख्य कार्यकारी अधिकारी, राज्य आरोग्य हमी सोसायटी, मुंबई
६. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
७. सहसंचालक, (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा संचालनालय, पुणे.
८. प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई. (३प्रती)
९. कक्ष अधिकारी (विघयो), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१०.वित्त विभाग, कार्यासन - व्यय -१३/अर्थसंकल्प-९, मंत्रालय, मुंबई-३२.
११.अर्थसंकल्प शाखा, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२.निवड नस्ती.